**अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्क मान्य करणे) अधिनियम, २००६, नियम २००८ व सुधारित नियम, २०१२ अंतर्गत सामुहिक वनहक्कांचे संवर्धन आणि व्यवस्थापन आराखडे तयार करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः वहका-२०१७/प्र.क्र.७७/का-१४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ६ जुलै, २०१७.

**वाचा** :- १) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्क मान्य करणे) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम २०१२.

२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: वहका-२०१४/प्र.क्र.६६/का.१४, दिनांक २४ जून, २०१५

३) जन जाती कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. २३०११/१६/२०१५-FRA, दिनांक २३ एप्रिल, २०१५

**शासन परिपत्रक :-**

अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्क मान्य करणे ) अधिनियम, २००६ व नियम, २००८ आणि सुधारित नियम, २०१२ नुसार अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी यांना कलम ३ (१) नुसार वैयक्तिक व सामूहिक वनहक्क किंवा दोहोंचे धारणाधिकार मिळण्याचे अधिकार प्राप्त झालेले आहेत. यामध्ये अनुसूचित जमाती किंवा इतर पारंपारिक वननिवासी यांना स्वत:च्या उपजीविकेकरिता शेती कसण्यासाठी वनजमिनी धारण करण्याचा व त्यामध्ये राहण्याचा हक्क; निस्तार सारखे हक्क; गावाच्या सीमांतर्गत किंवा सीमेबाहेर पारंपारिकरीत्या गोळा केले जाणारे गौण वनोत्पादन गोळा करणे, त्याचा वापर करणे किंवा त्याची विल्हेवाट लावणे यासाठी स्वामित्व हक्क; पाण्यामधील मत्स्य व अन्य उत्पादने, चराई करणे, पारंपारिक मोसमी साधनसंपत्ती मिळविण्यास हक्कदार असणे; निरंतर वापर करण्यासाठी पारंपारिकरीत्या संरक्षण व संवर्धन करण्यात आलेल्या कोणत्याही सामाजिक वनस्त्रोताचे संरक्षण, पुनर्निर्माण, संवर्धन, व्यवस्थापन करण्याचे हक्क इ. विविध वनहक्क प्राप्त झाले आहेत.

२. प्रस्तुत अधिनियमाच्या कलम ५ आणि कलम ३(१)(झ) नुसार अनुसूचित जमाती आणि इतर पारंपारिक वन निवासी यांना "निंरतर वापर करण्यासाठी पारंपरिकरित्या संरक्षण व संवर्धन करण्यात आलेल्या कोणत्याही सामाजिक वन-स्त्रोतांचे संरक्षण, पुनर्निर्माण, संवर्धन किंवा व्यवस्थापन करण्याचा हक्क" प्रदान करण्यात आला आहे. अनुसूचित जमाती व इतर पारंपरिक वन निवासी (वन हक्क मान्य करणे) नियम, २००८ च्या नियम ४(१)(ङ) अन्वये ग्रामसभा वनहक्क अधिनियमाच्या कलम ५ च्या तरतुदी अंमलात आणण्याच्या दृष्टीने, वन्यजीवन, वन व जैविक विविधता यांचे संरक्षण करण्यासाठी आपल्या सदस्यांमधून गठीत करु शकेल. सदर वन हक्क नियमाच्या नियम ४(१)(च) नुसार उक्त नियम ४(१)(ङ) अंतर्गत गठीत समितीला अनुसूचित जमातीचे वननिवासी व इतर पारंपरिक वननिवासी यांच्या फायद्यासाठी अशा सामूहिक वनसंपत्तीचे निरंतर व समसमान व्यवस्थापन करण्यासाठी सामूहिक वनसंपत्तीचे संवर्धन करण्याची व तिचे व्यवस्थापन करण्याची योजना तयार करणाऱ्या आणि वन विभागाच्या सूक्ष्म योजना किंवा चालू योजना किंवा व्यवस्थापन योजनांबरोबर अशा संवर्धन व व्यवस्थापन योजनांचे आवश्यक वाटेल अशा फेरबदलांनिशी एकत्रीकरण

करण्याचे अधिकार असतील. यानुसार, जन जाती कार्य मंत्रालय, भारत सरकार यांनी त्यांच्या दिनांक २३ एप्रिल २०१५ च्या पत्रान्वये वन हक्क कायद्याच्या कलम १२ अंतर्गत सामुहिक वन संसाधनाच्या मान्यता आणि अधिनस्त ठेवणे आणि त्यांचे व्यवस्थापन करणे याबाबतची मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत. त्यानुषंगाने सामुहिक वनहक्कांचे संवर्धन आणि व्यवस्थापन आराखडे तयार करण्यासाठी खालीलप्रमाणे सविस्तर मार्गदर्शक सूचना विहीत करण्यांत येत आहेत :-

(i) वन हक्क अधिनियम, २००६ च्या कलम ३(१)(झ) आणि कलम ५ नुसार, सामूहिक वन हक्कांचे संरक्षण, पुनर्निर्माण किंवा संवर्धन किंवा व्यवस्थापन याबाबतचे प्राधिकार ग्रामसभा तिच्या सदस्यांची नियम ४(१)(ङ) अंतर्गत वन्यजीव आणि जैवविविधता यांचे सरंक्षणासाठी गठीत समितीला आहेत. ग्रामसभा म्हणजे वन हक्क अधिनियम २००६ च्या कलम २ (छ) आणि २(त) मध्ये दिलेल्या व्याखेप्रमाणे आहे.

(ii) प्रत्येक ग्रामसभा तिच्या सदस्यांना व्यवस्थित समजेल अशा सोप्या स्वरुपात वन हक्क संवर्धन आणि व्यवस्थापन आराखडा तयार करु शकेल.

(iii) वन हक्क व्यवस्थापन आराखड्यामध्ये जंगलात प्रवेश, जंगलाचा वापर आणि जंगलाचे संवर्धन याबाबतच्या नियम आणि नियमनाचा समावेश असेल.

(iv) ग्रामसभा आणि वन हक्क नियम ४(१)(ङ) अंतर्गत समिती वन विभागाच्या सूक्ष्म योजना किंवा चालू योजना किंवा व्यवस्थापन योजनांना आवश्यक वाटेल अशा फेरबदलांनिशी ग्रामसभेने मंजूर केलेल्या संवर्धन व व्यवस्थापन योजनांशी एकत्रीकरण करण्यासाठी प्राधिकृत असेल.

(v) उपरोक्त (ii), (iii) आणि (iv) प्रमाणे ग्रामसभेने घेतलेले सर्व निर्णय अंतिम असतील आणि कोणतेही प्राधिकरण वा कोणतीही व्यक्ती यांना या निर्णयांमध्ये बदल करण्याचे अधिकार नसतील.

(vi) सामूहिक वन संसाधनांच्या संवर्धन आणि व्यवस्थापन आराखड्याबाबतचा सूचक स्वरुपातील नमूना "परिशिष्ट- अ" प्रमाणे आहे. मात्र, अधिनियमाच्या कलम १२ अनुसार जनजाती कार्य मंत्रालयाच्या दिनांक २३ एप्रिल २०१५ च्या पत्रातील मार्गदर्शक सूचनेनुसार प्रत्येक ग्रामसभा सामूहिक वन संसाधनांच्या संवर्धन आणि व्यवस्थापनाचा सोपा आराखडा स्वत: तयार करु शकेल.

(vii) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्क मान्य करणे) अधिनियम, २००६ अन्वये वनांचे संरक्षण, संवर्धन, व्यवस्थापन आणि पुर्ननिर्माणाची जबाबदारी ग्रामसभांना देण्यात आली असल्यामुळे, वनांच्या सरंक्षण, पुर्ननिर्माण आणि व्यवस्थापनांच्या संदर्भातच्या सर्व निर्णयांबाबत ग्रामसभेची संमती घेण्यात यावी.

(viii) सर्व जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद आणि प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी ग्रामसभांच्या व्यवस्थापन आराखड्याच्या अधिकारांबाबत ग्रामसभांना माहिती होईल याबाबत खात्री करावी तसेच ग्रामसभांना व्यवस्थापन आराखडे तयार करण्याबाबत उत्तेजन द्यावे.

(ix) ग्रामसभेने तयार केलेला व्यवस्थापन आराखडा सर्व संबंधितांना बंधनकारक असेल.

३. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी "नोडल एजन्सी" म्हणून याप्रकरणी वेळोवेळी आढावा घ्यावा व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०६२११२५८१०४७२४ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Laxmikant Gopalrao Dhoke

Digitally signed by Laxmikant Gopalrao Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, cn=Laxmikant Gopalrao Dhoke
Date: 2017.07.06 16:34:22 +05'30'

**( ल. गो. ढोके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४ सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
५ सचिव, (ग्राम विकास) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
७. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
८. प्रधान मुख्य वन संरक्षक ( वन बल प्रमुख ) महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. सर्व विभागीय आयुक्त,
१०. सर्व जिल्हाधिकारी.
११. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर, अमरावती,
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद.
१३. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१४. सर्व तालुका सामुहिक वनहक्क व्यवस्थापक
१५. सर्व जिल्हा सामुहिक वनहक्क व्यवस्थापक
१६. सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्या.अधिकारी,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
१५. निवड नस्ती.(का.१४) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.

**( आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.वहका-२०१७/प्र.क्र.७७/का-१४, दि. ६ जुलै, २०१७) सोबतचे**

**"परिशिष्ट- अ "**

**सामूहिक वन संसाधने व्यवस्थापन आराखडा आणि ठरावाचा आदर्श नमुना**
**(टीप : हा एक सूचक स्वरुपाचा व्यवस्थापन आराखडा नमुना आहे. मात्र, प्रत्येक ग्रामसभा आपआपल्या स्तरावर साध्या नमुन्यात स्वत:चा व्यवस्थापन आराखडा बनवू शकेल)**

---

**ग्रामसभेचे नाव:**

**ग्राम पंचायतीचे नाव:**

**तालुक्याचे नाव:**

**जिल्हा:**

**दिनांक:**

## ठराव:

**क.)** असे घोषित करण्यात येते की, यासोबत जोडलेल्या व्यवस्थापन आराखड्यावर चर्चा झाली आहे आणि सदर व्यवस्थापन आराखडा आजपासून ........... वर्षे/महिने कालावधीसाठी स्वीकारण्यात आला आहे.

**ख.)** असेही घोषित करण्यात येते की, सोबतचा आराखडा वन विभागाच्या आराखडा/ सूक्ष्म आराखडा/ चालू आराखडा (Management Plan / Micro Plan / Working Plan) यांच्याशी खालीलप्रमाणे सुसंगत राहिल:

i) सोबतचा व्यवस्थापन आराखडा यापुढे वन विभागाच्या वनव्यवस्थापन आराखडा/सूक्ष्म आराखडा/चालू आराखडा यामध्ये अंतर्भूत असेल.

ii) वन विभागाच्या व्यवस्थापन आराखडा/चालू आराखडा/सूक्ष्म आराखडा यातील या सामूहिक वन संसाधन व्यवस्थापन आराखड्याशी सुसंगत नसलेला भाग यापुढे वगळण्यात आला आहे असे समजण्यात येईल. वन विभागाने विनाविलंब याबाबत खात्री करावी.

**ग.)** सामूहिक वन संसाधने व्यवस्थापन समिती (किंवा ग्रामसेवक) यांना या आराखड्याची प्रत स्थानिक जिल्हा वन संरक्षक यांना पाठविण्याबाबत सूचित करण्यात येत आहे.

**घ.)** याद्वारे असेही घोषित करण्यात येते की, ही ग्रामसभा जेंव्हा गरज भासेल तेंव्हा हा व्यवस्थापन आराखडा सुधारीत करणे, तसेच वन विभागाच्या सुक्ष्म/चालू आराखड्यातील भाग सुधारीत करणे याबाबतचा हक्क राखून ठेवत आहे.

**च.)** यानंतर असेही घोषित करण्यात येते की, कोणीही या सामूहिक वनहक्क क्षेत्रामध्ये व्यवस्थापन, वृक्षारोपण, वृक्षतोड आणि वनांचे पुनरुज्जीवन यासारखे उपक्रम या ग्रामसभेच्या पूर्व सूचित परवानगीशिवाय घेणार नाहीत.

## सामूहिक वन संसाधने व्यवस्थापन आराखडा

**आराखडा तयार करण्याची तारीख:**

**१. सामूहिक वन हक्क क्षेत्राची सद्यस्थिती**

*(टीप: येथे सध्याची वनाची स्थिती, जैव विविधता इत्यादींविषयी नमूद करावे. जर निश्चित स्वरुपात माहिती उपलब्ध नसेल तर स्थानिक ज्ञानावर आधारित ढोबळ तपशील नमूद करावा.)*

**i)** शासन अभिलेखानुसार देण्यात आलेला एकूण वनहक्क: .........हेक्टर

**ii)** जीपीएस सर्वेक्षण (घेण्यात आले असल्यास) अंदाजित क्षेत्र: ........हेक्टर
*(जीपीएस सर्वेक्षण करण्यात आले नसल्यास, "लागू नाही" असे लिहावे)*

**iii)** कंपार्टमेंट क्रमांक (माहित असल्यास):

**iv)** सामूहिक वनहक्क अंतर्गत स्थानिक/पारंपरिक वन क्षेत्राचे नाव (नावे ): (यादी)

**v)** सामूहिक वन हक्क क्षेत्राची सद्यस्थिती:
*(टीप: हे अनेक प्रकारांनी करता येवू शकेल. वेगवेगळे भाग आणि त्यांची स्थिती दर्शविणारा उपग्रह नकाशा तयार करता येईल. तपशीलवार वनस्पती सर्वेक्षणही करता येईल. खालीलप्रमाणे सोप्या पध्दतीने अंदाजही बांधता येतील)*

क) दाट वृक्ष असलेले क्षेत्र (एकूण सामूहिक वन हक्कांच्या टक्केवारीत) *(अंदाजित)*

ख) खुल्या वृक्ष असलेले क्षेत्र (एकूण सामूहिक वन हक्कांच्या टक्केवारीत) *(अंदाजित)*

ग) गवत असलेले क्षेत्र (एकूण सामूहिक वन हक्कांच्या टक्केवारीत) *(अंदाजित)*

घ) वनविभागाचे वृक्षारोपण असलेले क्षेत्र (एकूण सामूहिक वन हक्कांच्या टक्केवारीत) *(अंदाजित)*

च) नापीक परंतु पुनरुज्जीवीत करता येणारे क्षेत्र (एकूण सामूहिक वन हक्कांच्या टक्केवारीत) *(अंदाजित)*

छ) नापीक आणि खडकाळ व पुनरुज्जीवीत न करता येणारे क्षेत्र (एकूण सामूहिक वन हक्कांच्या टक्केवारीत) (अंदाजित)

ज) वृक्ष, खुरटी झाडे किंवा गवत यांच्या सामान्य प्रजाती: (५ ते १० प्रजातींची यादी)

झ) सर्व सामान्य प्राण्यांच्या प्रजाती

ण) काही छोटी तळी असल्यास

vi) सामूहिक वनसंसाधनांच्या आणि सामूहिक जमीनीच्या सध्या अस्तित्वात असलेल्या व पूर्वीच्या व्यवस्थापन पध्दती, तसेच याबद्दलची सांस्कृतिक/धार्मिक पद्धत (असल्यास) , यांचा तपशील

**२. सामूहिक वन संसाधनांची सध्याची गरज:**

**i)** *(टीप: सामूहिक वन हक्क क्षेत्रातून मिळणारे महत्वाचे लाभ (ही एक सूचक यादी आहे, आवश्यकतेप्रमाणे बदल करावा. यादीमध्ये प्रथम सगळ्यात महत्वाचे आणि नंतर कमी महत्वाचे याप्रमाणे)*

क) जळाऊ लाकूड

ख) गवत / चराई

ग) घर दुरुस्ती आणि कुंपण यासाठी लागणारे लाकूड
घ) तेंदु पाने
च) बांबु
छ) मोह फुले
ज) चारोळी
झ) मध
ण) कुपे मधून काढावयाचे लाकूड

**ii)** क) पवित्र ठिकाणे (यादी)
ख) गाव तळी/टँक/प्रवाह यांचे पाणलोट क्षेत्राचे संरक्षण

**iii)** बऱ्याच गावकऱ्यांकडून सामूहिक वन हक्क क्षेत्राबाहेरचा भाग वापरात असल्यास, कशासाठी ते नमूद करावे (जसे)
क) तेंदू पत्ता संकलन
ख) चराई
ग) जळाऊ लाकूड गोळा करणे

## ३. सामूहिक वन हक्क जंगलासाठीचे सर्वात मोठे धोके

*(टीप: ग्रामसभा यावर सविस्तर खुली चर्चा करेल आणि शाश्वत वन व्यवस्थापन यासाठी कोणते धोके वाटतात ते यामध्ये नमूद करेल. उदाहरणादाखल खालीलप्रमाणे)*

क) बाजूच्या गावांकडून दबाव ? कशा प्रकारे ? चराई ? लाकूड गोळा करणे ? बेकायदेशीर वृक्षतोड ? शिकार ? याबाबत शेजारच्या गावासोबत वाद होतात का ?
ख) गावातून अंतर्विरोध ? दबाव ? कशा प्रकारे ? चराई ? लाकूडफाटा गोळा करणे ? बेकायदेशीर वृक्ष तोड ? शिकार ?
ग) मोहा किंवा तेंदू पत्ता यासाठी मोठ्या प्रमाणात आग ? कुणामार्फत ?
घ) कुपे फेलिंग मुळे जंगलांचे नुकसान ?
च) खाणकाम किंवा धरणे किंवा रस्ते विकास यामुळे जंगलांचे नुकसान
छ) अवक्रमित किंवा अनुत्पादक वनक्षेत्र - त्यामुळे लोकांचे त्यावरील स्वारस्य कमी होणे ?
ज) वनक्षेत्रांचे अवमूल्यन - ज्यायोगे गावतळी गाळाने भरणे अथवा पाणी पातळी खालावणे ?

*(टीप: वेगवेगळ्या सामूहिक वन क्षेत्रासाठी वेगवेगळ्या अडचणी असू शकतील)*

## ४. सामूहिक वन हक्काचे संरक्षण, पुनरुज्जीवन आणि व्यवस्थापन यासाठीचा आराखडा (वर नमूद केलेल्या शाश्वत वन व्यवस्थापनातील धोके कमी करणे अथवा सोडविणे यासाठी काय करता येईल ?) उदाहरणार्थ:

i) वनाच्या संरक्षण आराखड्याचा तपशील (आवश्यक असल्यास):
क) वृक्षतोड/चराई/आग बद्यलचे नियम
ख) अंतर्गत/बाह्य व्यक्तिंकडून उल्लंघनाविरुध्द संरक्षण/ निरिक्षण
ग) ग्रामसभेमार्फत वनाची गस्त-विविध सदस्यांच्या भूमिका व जबाबदाऱ्या

घ) नियमांच्या उल्लंघनाबाबत काय कार्यवाही करावी
च) वृक्ष तोडीवर अंशत: वा पूर्णत: निर्बंध

ii) ग्रामसभा घेऊ ईच्छित असलेले नवीन वृक्षारोपण, पुनरुज्जीवन आणि सरंक्षणाच्या उपक्रमांचा तपशील (असल्यास)

*(टीप: ग्रामसभेने त्या क्षेत्रात घेणाऱ्या उपक्रमांविषयी नमूद करावे. या यादीमध्ये खालील बाबींचा समावेश करता येईल.)*

क) नवीन वृक्षारोपण
ख) चारा निर्मिती
ग) मृद आणि जल संधारण उपक्रम
घ) इतर तपशील

iii) अशा उपक्रमांसाठी लागणाऱ्या योजना आणि निधी याबाबत ग्रामसभेचा अंदाजित तपशील (गरज असल्यास):

**५. स्वत:च्या जबाबदारीचा तपशिल: अशा अडचणींबाबत ग्रामसभेची भूमिका काय असेल ? जसे: सामूहिक वन हक्कांच्या सीमांची गस्त, वृक्षारोपण किंवा गवत रोपण, तलावातील गाळ काढणे, आग नियंत्रण इत्यादी ग्रामसभा यासाठी किंती निधी देवू शकेल याबाबतही नमूद करावे.**

**६. वन विभाग आणि इतर संस्था यांच्याकडून ग्रामसभेला अभिप्रेत असणारी आश्वासने आणि मदत याविषयीचे तपशील (उदा.)**

क) शिकाऱ्यांविरुध्द वन विभागाकडून संरक्षणासाठी साहाय्य
ख) कुपे फेलिंग बाबत आश्वासने ग्रामसभेच्या परवानगीनेच अथवा नाही
ग) आग नियंत्रणासाठी वन विभागाचे साहाय्य
घ) सामूहिक वन हक्कांचे नकाशे आणि सीमांकन (कुणाशी संपर्क: महाविद्यालये, अशासकीय संस्था, आदिवासी विभाग) ?
च) जैवविविधता तपासण्यासाठी मदत आणि संवर्धन व व्यवस्थापनाचे नियोजन: महाविद्यालये, अशासकीय संस्था, आदिवासी विभाग?
छ) शेजारील गावांशी असलेले वाद मिटविणे: (कुणाशी संपर्क, अशासकीय संस्था, ग्रामसभा फेडरेशन, आदिवासी विभाग, जिल्हास्तरीय समिती)
ज) जलसंधारण किंवा संरक्षण किंवा वृक्षारोपण उपक्रमांसाठी आदिवासी विकास विभागाकडून आर्थिक मदत (आदिवासी उपयोजना, किंवा ग्राम विकास विभाग (विविध योजना))
झ) तेंदू पत्ता किंवा बांबू किंवा इतर उत्पादने यांच्या विक्रीसाठी मदत: अशासकीय संस्था, इतर तज्ज्ञ, आदिवासी विभाग, इतर विभाग

**७. आराखडा अंमलबजावणीसाठी लागणारा कालावधी ? शक्यतो पुन्हा केंव्हा सुधारित करणार?**

---